




महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र.५५७, ५ वा मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दूरध्वनी क्रमांक-०२२-२२७९४२५७ Email ID : Desk14b.gad-mh@gov.in

क्रमांक : कअनि-११२५/प्र.क्र.५/प्रशा-२ दिनांक:- २७ मार्च, २०२५

**प्रति,**

सह/उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**विषय:-** <u>सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (गट-अ) यांची पदे मंत्रालयीन संवर्गातील कक्ष अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरणेबाबत</u>

**संदर्भ:-** १) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२, दि.१७.१२.२०१६
२) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का.१२, दि.१६.०२.२०१८
३) सा.प्र.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दि.३१.०८.२०१७

**महोदय/महोदया,**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दिनांक १७.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भ क्र.२ येथील दिनांक १६.०२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सदर धोरणामध्ये सुधारणा करण्यात आली आहे. तसेच मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबतची कार्यपध्दती संदर्भ क्र.३ येथील दिनांक ३१.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे.

२. **उपरोक्त शासन निर्णयान्वये विहित कार्यपध्दतीनुसार इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिपत्याखालील <u>सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (गट-अ)</u> (वेतनश्रेणी एस-१८ ₹४९,१००-१५५,८००) यांची विवरणपत्र-अ मध्ये नमूद कार्यालयातील एकूण २९ पदे प्रतिनियुक्तीने भरण्याकरिता मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकाऱ्यांमधून इच्छुकता मागविण्यात येत आहे.**

३. उपरोक्त नमूद पदे मंत्रालयीन संवर्गातील कक्ष अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरण्याकरिता सदर जाहिरात प्रसिध्द करण्यात येत असल्याने, या जाहिरातीस अनुसरुन क्षेत्रिय कार्यालयातील अधिकाऱ्यांनी सदर पदाकरिता या विभागाकडे अर्ज सादर करु नयेत व असे अर्ज सादर करण्यात आल्यास ते विचारात घेतले जाणार नाहीत, तसेच त्याबाबत संबंधितांस काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

४. उपरोक्त पदासाठी प्रतिनियुक्तीवर जाण्यास इच्छुक असलेल्या मंत्रालयीन कक्ष अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांनी परस्पर या विभागाकडे अर्ज सादर करु नयेत. त्यांनी आपआपल्या विभागामार्फत अर्ज सादर केल्यानंतर विभागाने संबंधित कक्ष अधिकाऱ्यांची शिफारस करण्यात यावी. परस्पर अर्ज सादर केल्यास त्या अर्जाचा विचार करण्यात येणार नाही व त्याबाबत संबंधितांस काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

५. साप्रवि, शासन निर्णय, दिनांक १७.१२.२०१६ मधील परिच्छेद ५ (अ) ७) मध्ये नमूद केल्यानुसार कक्ष अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पुर्ण होऊन त्यानंतर त्यांचा किमान ५ वर्षे सेवा कालावधी पूर्ण झालेला नाही, अशा अधिकाऱ्यांची या विभागाकडे शिफारस करण्यात येऊ नये.

६. सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी इच्छुक कक्ष अधिकाऱ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधिन शासन निर्णयातील विहित तरतूदीनुसार अर्जांची छाननी करुन आपल्या विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने इच्छुक कक्ष अधिकाऱ्याचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव सोबत जोडलेल्या विहित प्रपत्रातील माहिती व मागील पाच वर्षांच्या परिपूर्ण गोपनीय अहवालांच्या छायांकित प्रतीसह या कार्यासनाकडे **दिनांक १७.०४.२०२५** पर्यंत पोहोचतील अशा रीतीने पाठवावा. (नोंदणी शाखेत पाठवू नये)

७. एकदा निवड झालेल्या कक्ष अधिकाऱ्यांस त्याचे नांव मागे घेता येणार नाही. तसेच आपल्या विभागातून सदर पदावर प्रतिनियुक्तीसाठी जाण्यास कोणीही कक्ष अधिकारी इच्छुक नसल्यास तसेही कृपया **दिनांक १७.०४.२०२५** पर्यंत या विभागास कळविण्यात यावे.

८. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी सदरचे पत्र त्यांच्या विभागातील सर्व कक्ष अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणावे.

सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२७१७५४०९८२०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**आपला,**

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.03.27 17:54:58 +05'30'

**( ग.स.परब )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) उप सचिव (आस्था-२), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई

२) निवड नस्ती/प्रशा-२

## विवरणपत्र-अ

| अ.क्र. | जिल्हा कार्यालये | पदसंख्या |
|---|---|---|
| १) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा अकोला | ०१ |
| २) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा बुलढाणा | ०१ |
| ३) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा वाशिम | ०१ |
| ४) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा हिंगोली | ०१ |
| ५) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा छत्रपती संभाजीनगर | ०१ |
| ६) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा जालना | ०१ |
| ७) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा नांदेड | ०१ |
| ८) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा धाराशिव | ०१ |
| ९) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा लातूर | ०१ |
| १०) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा परभणी | ०१ |
| ११) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा मुंबई शहर | ०१ |
| १२) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा रत्नागिरी | ०१ |
| १३) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा रायगड | ०१ |
| १४) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा मुंबई उपनगर | ०१ |
| १५) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा ठाणे | ०१ |
| १६) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा पालघर | ०१ |
| १७) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा सिंधुदूर्ग | ०१ |
| १८) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा गडचिरोली | ०१ |
| १९) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा चंद्रपूर | ०१ |
| २०) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा नागपूर | ०१ |
| २१) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा भंडारा | ०१ |
| २२) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा वर्धा | ०१ |
| २३) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा गोंदिया | ०१ |
| २४) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा जळगाव | ०१ |
| २५) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा धुळे | ०१ |
| २६) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा नाशिक | ०१ |
| २७) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा नंदूरबार | ०१ |
| २८) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा पुणे | ०१ |
| २९) | सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, जिल्हा सोलापूर | ०१ |
| | **एकूण** | **२९** |

**सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (गट-अ) यांची पदे मंत्रालयीन संवर्गातील कक्ष अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरणेबाबत**

## प्रतिनियुक्तीबाबतचे विहीत प्रपत्र

<table>
<tr><td>१)</td><td>कक्ष अधिकारी यांचे संपूर्ण नाव</td><td></td></tr>
<tr><td>२)</td><td>सध्या वेतन घेत असलेली वेतनश्रेणी</td><td></td></tr>
<tr><td>३)</td><td>जन्मदिनांक</td><td></td></tr>
<tr><td>४)</td><td>प्रथम नियुक्तीचा दिनांक</td><td></td></tr>
<tr><td>५)</td><td>कक्ष अधिकारी पदावरील नियुक्तीचा दिनांक</td><td></td></tr>
<tr><td>६)</td><td>सेवानिवृत्तीचा दिनांक<br>[पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुद ५ (ब) (६)]</td><td></td></tr>
<tr><td>७)</td><td>शैक्षणिक अर्हता</td><td></td></tr>
<tr><td>८)</td><td>भ्रमणध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>९)</td><td>मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत)</td><td></td></tr>
<tr><td>१०)</td><td>मत्ता व दायित्व सादर केली आहेत का? (दि.३१.३.२०२४ रोजीचे)</td><td></td></tr>
<tr><td>११)</td><td>५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास)</td><td></td></tr>
<tr><td>१२)</td><td>संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (कालावधी, पद व ठिकाण)<table><tr><td>दिनांकापासून ते दिनांकापर्यंत</td><td>पद</td><td>प्रतिनियुक्तीचे ठिकाण (कार्यालय)</td></tr><tr><td></td><td></td><td></td></tr><tr><td></td><td></td><td></td></tr></table></td><td>प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी<br>------- वर्षे</td></tr>
<tr><td>१३)</td><td>संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे काय?</td><td></td></tr>
<tr><td>१४)</td><td>मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>१५)</td><td>प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे?</td><td></td></tr>
</table>

**(आस्थापना अधिकाऱ्याचे नांव, पदनाम व स्वाक्षरी)**